सामान्य प्रशासन विभाग (खुद) साठी बाहय यंत्रणेकडून मासिक दराने वाहनचालक पुरविण्यासाठी दिनांक दि.१.१०.२०२० ते दिनांक ३०.११.२०२१ या कालावधीसाठी दरकरार करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. बावासे-२०२०/प्र.क्र.३४/का.२४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १२ ऑक्टोबर, २०२०

वाचा :-सामान्य प्रशासन विभागाने दिनांक २१ सप्टेंबर २०२० रोजी शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द केलेली निविदा सूचना.

प्रस्तावना : -

सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) मध्ये ९ वाहने असून ५ शासनाचे वाहनचालक कार्यरत आहेत. उर्वरित वाहनांसाठी कंत्राटी वाहनचालक नियुक्त करण्याची बाब विचाराधीन आहे. कंत्राटी वाहनचालक नियुक्त करण्यासाठी वित्त विभाग, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक पदनि २०१३/प्र. क्र. ११/१३ विसु-१, दिनांक ०२-०२-२०१३ मधील तरतुदीनुसार निविदा मागवून बाह्ययंत्रणेव्दारे वाहनचालक पुरविण्यासाठी कंत्राटदाराची नेमणूक करुन त्यांच्याकडून मासिक दराने वाहन चालक नियुक्त करण्याची पध्दती अवंलबिण्यात आली आहे.

२ मे. क्रिष्णा मोटर्स, जोगेश्वरी, मुंबई यांचा देकार तसेच संस्थेच्या वाहन चालकांची सेवा विचारात घेऊन संस्थेस ४ वाहनचालक पुरविण्यासाठी दिनांक ३० सप्टेंबर २०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली होती. सदर मुदतवाढ कालावधी दिनांक ३० सप्टेंबर, २०२० रोजी समाप्त झालेला आहे.

३. नवीन दरकरार करण्यासाठी शासनाच्या संगणक संकेतस्थळावरुन दिनांक ०१/१०/२०१९ ते ३०/११/२०२१ एक वर्ष कालावधीसाठी मासिक दरावर वाहनचालक पुरविण्याबाबत ई-निविदा दिनांक २१ सप्टेंबर २०२० रोजी शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आली होती. त्यानुसार **दिनांक ३० सप्टेंबर २०२० पर्यंत ७ निविदाधारकानी त्यांच्या निविदा सादर केलेल्या होत्या.** सदर निविदा **दिनांक ५ ऑक्टोबर २०२० रोजी दुपारी ३.३० वाजता उघडण्यात आल्या असून त्यांनी सादर केलेले वाहनचालक पुरविण्याचे दर पुढीलप्रमाणे आहेत**.

| कंपनीचे नाव | वाहनचालकाच्या वेतनाचा मासिक ठोक दर. वाहनचालकाचा दिवसाचा कामकाजाचा कालावधी ९ तास राहील | दररोजच्या ९ तासापेक्षा जास्त काम झाल्यास शासनाच्या प्रचलित दराने अतिकालिक भत्ता वाहनचालकास देय राहील (रु. ४०/-). | मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या हद्दीबाहेर जावे लागल्यास वाहनचालकाच्या भत्याचा दर . | वाहनचालकास रात्रौ १०.०० वा. नंतर थांबावे लागल्यास त्याच्या जेवण भत्याचा दर . | वाहनचालकास रात्रौ ११.०० वा. नंतर थांबावे लागल्यास त्याच्या घरी जाण्याच्या प्रवास भत्याचा दर. |
|---|---|---|---|---|---|
| सुकन्या इंटरप्राईजेस, मुलुंड, मुंबई | ३०,००० | ४० | ८०० | ५०० | ४०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| लोकभारती बेरोजगार सेवा सहकारी संस्था लि. शिवडी,मुंबई | २१००० | ४० | ३०० | १५० | २०० |
| **क्रिष्णा मोटर्स, जोगेश्वरी मुंबई** | **१३३३०** | **४०** | **३००** | **१५०** | **१५०** |
| ओम गुरुदेव स्टडी सेंटर, नाशिक | १८८२३ | ४० | १९३ | १२१ | २२० |
| देव मामलेदार स्वयं रोजगार सेवा सहकारी संस्था मर्या,नाशिक | १९३०० | ४० | २२० | ११२ | २०२ |
| लोकसेवा सुशिक्षित बेरोजगार सेवा सहकारी संस्था, महाराष्ट्र | १४९२५ | ४० | २०० | १५० | १०० |
| ग्लोबल टोटल सोल्युशन, नवी मुंबई | १९१५२.५३ | ४० | - | १०० | १०० |

**शासन निर्णय :-**

उपरोक्त दरपत्रके पहाता मे. क्रिष्णा मोटर्स, जोगेश्वरी मुंबई यांचे दरपत्रक सर्वात कमी असल्यामुळे **दिनांक ०१/१०/२०२० ते ३०/११/२०२१ एक वर्ष कालावधीसाठी** मासिक दरावर ४ वाहनचालक पुरविण्याबाबत त्यांच्याशी करार करण्यास शासन मंजूरी देत आहे.

**निविदेच्या अटी व शर्ती पुढीलप्रमाणे आहेत**:-

१. सदर पदाची नेमणूक ही पूर्णत: कंत्राटी स्वरुपाची असेल.
२. या पदावरील कर्मचारी यांना शासकीय कर्मचारी म्हणून गणले जाणार नाहीत.
३. वाहनचालक भारतीय नागरीक असावा तसेच त्यास मराठी लिहिता / वाचता / बोलता येणे आवश्यक राहील.
४. वाहनचालकाचे वय १८ वर्षे पूर्ण असावे, व ५८ वर्षापेक्षा जास्त नसावे.
५.वाहनचालकासोबत त्याचा वाहन चालविण्याचा परवाना त्याशिवाय त्याचे ओळखपत्र (आधारकार्ड/निवडणूक ओळखपत्र/पॅन कार्ड यापैकी एक) त्यांचेकडे असावे.
६. संस्थेतर्फे पुरविण्यात येणारा वाहनचालक गुन्हेगारी पार्श्वभूमीचा / प्रवृत्तीचा नसावा,

७. वाहन चालकाने पोलीस तपासणी अहवाल देणे बंधनकारक आहे..

८. वाहन चालकाने डयुटीवर असतांना नशापान/धुम्रपान व तंबाखूजन्य पदार्थांचे सेवन करता नये.

९. वाहनास अपघात झाल्यास व दुर्दैवाने वाहन चालकास गंभीर स्वरुपात इजा झाल्यास वाहनचालकास वैद्यकीय खर्च अथवा नुकसान भरपाईचे कोणतेही दायित्व शासनावर असणार नाही..

१०. कंपनी/संस्थेतर्फे काम करणाऱ्या वाहनचालकाच्या सेवेचे कोणतेही उत्तरदायित्व शासनावर असणार नाही.

११. वाहन चालक पुरवठादाराने शासनाने निर्धारित केलेल्या वेतन दराने वेतन व वेळोवेळी लागू असलेले अनुज्ञेय भत्ते वाहन चालकांस अदा करणे बंधनकारक आहे. तसेच वाहन चालकांना देय असलेले कायदेशीर दायित्व उदा. पी. एफ., इ.एस. आय. एस. , कामगार वेल्फेअर फंड इत्यादी बाबी वाहनचालकांच्या वेतनातून कपात करुन संबधित प्राधिकरणांकडे जमा करण्याची जबाबदारी पुरवठादाराची राहिल.

१२. वाहनचालकाचा प्रत्येक दिवसाचा कामकाजाचा कालावधी ९ तास राहील.

१३ वाहनचालकास अनुज्ञेय असलेले भत्ते निविदेत नमूद केल्याप्रमाणे असतील

१४ वाहन चालकांची सेवा पुरविण्याबाबत रु.१००/- च्या स्टॅम्प पेपरवर शासनाशी एक वर्षासाठी करार करणे आवश्यक राहील.

१५. ज्यावेळी एखादा वाहन चालक रजा घेतो त्यावेळी त्याऐवजी बदली वाहन चालक पुरविण्याची जबाबदारी संस्थेची राहिल. तसेच ज्यावेळी अतिरिक्त वाहनचालकाची मागणी करण्यात येईल तेवढया कालावधीसाठी वाहनचालक पुरविणे संस्थेस बंधनकारक राहिल.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०१५११०६१०६८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=c8b1e52c5c4f922ab6eb7a0b44101c838aea34f29fbff0aebe9d85c3de3468c2, ou=GENERAL ADMINISTRATION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2020.10.15 11:08:07 +05'30'

**( वि. रा. ठाकूर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई
२. महालेखापाल ( लेखापरिक्षा ) मुंबई
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी , मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. वित्त विभाग (वि.सु) / विनियम कार्यासन, मंत्रालय, मुंबई
६. मे. क्रिष्णा मोटर्स,जोगेश्वरी (पूर्व) मुंबई ४०० ०६५
७. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (आस्थापना), मंत्रालय, मुंबई-३२
८. अवर सचिव ( रोखशाखा),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
९. कार्यासन अधिकारी ( रोखशाखा),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
१०. निवडनस्ती/का.२४,सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई.